# अल्बर्ट श्वाइटज़र

स्पेंसर, मराठी



# अल्बर्ट श्वाइटज़र

स्पेंसर, मराठी





ही गोष्ट लोकांची सेवा करण्यात आयुष्य समर्पित केलेल्या एका माणासाची आहे. त्याचे नाव होते अल्बर्ट श्वाइटज़र. ही गोष्ट त्याच्या आयुष्यावर आधारलेली आहे. अल्बर्ट श्वाइटज़रच्या आयुष्यातील ऐतिहासिक सत्य शेवटी नमूद केलेली आहेत.

कोणे एके काळी...
पण गोष्ट तेवढीही जुनी नाही बरं. अल्बर्ट श्वाईट्झर नावाचा एक तरुण विद्यार्थी त्याच्या वसंताच्या सुट्ट्यांसाठी युनिव्हर्सिटीतून घरी येत होता

“किती सुंदर आहे इथे!” एल्सेसला म्हणजे स्वतःच्या गावी पोहोचल्यावर तो स्वतःशीच म्हणाला. त्याचे वडील गावच्या चर्चमध्ये पादरी होते. बागेतल्या निळ्या कळ्यांचा पसरलेला सुवास त्याला परिचित होता. जवळच सफरचंदांचा मंद गंध दरवळत होता.

अल्बर्टचे पाय घराकडे झपाझप पडू लागले. घरी आईबाबा वाट बघतच होते. घरी आल्यावर आईला मिठी मारली, बाबांनीही पाठ थोपटली. नंतर तो लागलीच त्याच्या छोट्याशा वरच्या खोलीत गेला. पागोळ्यात विसावलेली त्याची खोली प्रसन्न आणि प्रकाशमान होती.



त्या रात्री अल्बर्ट उशिरापर्यंत त्याच्या आईबाबांशी गप्पा मारत होता. अगदी पहाटे पहाटे तो झोपयला गेला. जेव्हा त्याला जाग आली तेव्हा खिडकीतून सूर्य डोकवायला लागला होता आणि आईने लावलेल्या बागेतल्या फुलांवर मधमाशा गुणगुणत होत्या.

अल्बर्टला उत्साह आला त्यामुळे पुन्हा बेडवर झोपणे त्याला अशक्य होते. तो उठला, त्याने कपडे बदलले आणि गावाजवळच्या जंगलातून फिरायला निघाला.





फिरताना रस्त्याजवळच असणाऱ्या झुडुपातून त्याला अगदी केविलवाणा हुंदका ऐकू आला. त्या आवाजामुळे तो थांबला, फार पुढे गेला नाही.

“कोणीतरी दुखावल गेलेय बहुतेक. कोण बरं असेल हा छोटा जीव?” अल्बर्ट स्वतःशीच बोलत आवाजाच्या दिशेने सरकला. एक छोटा कोल्हा जाळ्यात अडकलेला होता.

“अरेरे! एवढ्या प्रसन्न सकाळी तू खरंच असा जाळ्यात अडकायला नको.“ अल्बर्टने त्या कोल्ह्याला जाळ्यातून सोडवले. चुटकीसरशी तो कोल्हा त्या झाडीत गडप  झाला.



“बिचारा! त्यालाही त्याचा जीव तेवढाच प्रिय जेवढा मला माझा. आणि का असू नये? आयुष्य मौल्यवान आहे.”

विचार करत करत अल्बर्ट तिथेच पडलेल्या एका ओंडक्यावर बसला. त्याचे आता त्याच्या आयुष्याबद्दल विचार सुरु झाले. खरंच किती छान होते ते! त्याचे एक सुंदर कुटुंब होते. सर्वांचे एकमेकांवर प्रेम होते. तो निरोगी होता. तो एक हुषार विद्यार्थी आणि प्रतिभावान संगीतकारही होता.

“मला मिळालेली ही सारी देणगी, मी गृहीत धरु शकत नाही. मला नक्कीच त्याचा उपयोग इतरांसाठी करायला हवा. त्यांचा सदुपयोग व्हायला हवा.”
पण त्यांचा उपयोग इतरांसाठी कसा करावा ह्याचा तो विचार करु लागला. “मी आता २१ वर्षांचा आहे.” अल्बर्ट स्वतःशी बोलत होता, “मी अजून नऊ वर्षांचा वेळ माझ्यासाठी देणार. माझ्यातील कौशल्य ह्या वेळेत मी अजून विकसित करेन. जेव्हा मी तीस वर्षांचा होईन, मी लोकांच्या सेवेसाठी तयार असेन.”

अल्बर्टने वर पाहिले. तर त्याला क्षणभर असे वाटले की तो कोल्हा अजूनही तिथे उभा आहे, झुडुपातून त्याला पहात आहे.

“तुला काय वाटते रेनार्ड? तुला माझी योजना आवडली का?” त्याने विचारले.



“वसंत ऋतुच्या प्रसन्न सकाळी तरुणाने केलेली ही योजना आहे. जेव्हा तू तीस वर्षांचा होशील, तेव्हा तू सारे काही विसरशील. तू तेच करशील जे सर्वसामान्य माणसे करतात. छान महागडे कपडे घालशील, पैसे कमावशील आणि मी अजून कसा प्रसिद्ध होईन ह्याचा विचार करत असशील.” कोल्ह्याने उत्तर दिले.



हे ऐकून अल्बर्ट हसला. त्याला माहित होते की कोल्हा त्याच्याशी बोलत नाहिये. त्याचा अंतर्मनाशी संवाद सुरु होता. त्याचे अंतर्मन त्याला स्थिर होण्यासाठी सांगत होते. तरीसुद्धा अल्बर्टने कोल्ह्याचे शब्द कायम लक्षात ठेवण्याचे ठरवले. जेणेकरुन त्याची योजना तो कधीही विसरणार नाही.

“आपण बघुया रेनार्ड”, अल्बर्ट बोलला.

“तू मला रेनार्ड म्हणून का बोलावतोस?” कोल्ह्याने विचारले.

“कारण गोष्टींमध्ये नेहमी कोल्ह्याचे नाव रेनार्ड असते. आता तू माझ्यासोबत चल. म्हणजे माझ्या मनात येईल तेव्हा माझ्या योजना मी तुला सांगू शकेन. मी आणखी कोणाला सांगणार नाही. आपल्या दोघांमध्ये कायम रहस्य राहील.” अल्बर्टने सांगितले.

“ते रहस्य न सांगितलेले उत्तम!” कोल्हा म्हणाला. “जर तुझ्या योजना आता आईबाबांना कळल्या तर ते नक्कीच तुला कसला मानसिक आजार झाला नाही ना हे तपासायला डॉक्टरकडे नेतील.”



अल्बर्ट पुन्हा हसला. तो घरी परतला पण आपल्या निर्णयाबाबत त्याने आईवडीलांना काही सांगितले नाही. नंतरच्या नऊ वर्षात कोणताही सामान्य तरुण करणार नाही अशी अनेक कामे अल्बर्टने केली.

तो एक प्रसिद्ध पियानोवादक झाला. आणि मोठ्या प्रसिद्ध चर्चमध्ये, जिथे जुने पियानो होते तेथे त्याचे कार्यक्रम होऊ लागले.

अल्बर्टसुद्धा वडिलांसारखा पादरी झाला. दर आठवड्याला तो स्ट्रासबोर्ग चर्चमध्ये प्रवचने देत होता.



जुन्या ऑर्गन-पियानोवर अल्बर्टने एक पुस्तक लिहिले. महान संगीतकार जोहान्न सेबेस्टियन बाख ह्यांच्यावर त्याने एक पुस्तक लिहिले. धर्मशास्त्र आणि तत्त्वज्ञानावरही पुस्तके लिहिली. पुढे तो एक कॉलेजचा प्राचार्य झाला.

“अल्बर्ट अतिशय हुषार आहे.” लोक म्हणत. “एवढी सारी कामे करायला त्याला वेळ तरी कसा मिळतो? रात्री तो झोपतच नाही का?”

“त्यात काय एवढे?” रेनार्ड नेहमी असे म्हणे आणि जांभई देई. पण त्याचाकडे कोणी लक्ष देत नसे. खरतर अल्बर्ट्शिवाय तो कोल्हा कोणाला दिसतच नव्हता.





सुदैवाने अल्बर्ट धडधाकट होता. थोड्याशा झोपेने त्याची विश्रांती होत होती. पण वयाच्या पंचविशीमध्ये असे काहीतरी घडले की तो थोडा बिचकला आणि त्याला आश्चर्यही वाटले.

काय झाले असेल? तुम्हाला माहित आहे का?

अल्बर्ट एका मुलीला भेटला. काळेभोर डोळे आणि तसेच घनदाट केस असलेली हेलेन खूप सुंदर होती. प्रथमच अल्बर्टला रेनार्डशिवाय कोणाशीतरी बोलावे असू वाटू लागले. त्याला हेलेनशी बोलायचे होते.

“पण तिला कळेल?” त्याने विचारले.

“नाही.”रेनार्ड्ने उत्तर दिले. “तिला वाटेल की तू वेडा आहेस आणि पुन्हा ती तुझा विचारही करणार नाही.”

“पण तिला सांगितल्याशिवाय मी राहू शकत नाही. मला तिला सांगायला हवे.“ अल्बर्ट म्हणाला.

लोकांसाठी आपले जीवन व्यतीत करण्याचा निर्णय हेलेनला कसा सांगावा ह्याचा विचार करण्याआधीच त्याला तिच्याबद्दल एक आश्चर्यकारक गोष्ट कळली.

हेलेन एक दिवस त्याला म्हणाली होते, “मी खूप नशीबवान आहे. माझी तब्येत निरोगी आहे, माझे कुटुंब प्रेमळ आहे. मी हुषार आहे. पण मला मिळालेले हे सर्व मी गृहीत धरणार नाही. लोकोपयोगासाठी वापरेन. मी पंचवीस वर्षांची झाली की मी लोकांची सेवा करणार. त्यासाठी मी नर्सिंग शिकणार आहे.



अल्बर्टच्या आनंदाला सीमा नव्हती. त्याला गावेसे वाटू लागले. त्याला हेलेनला लग्नाची मागणी घालावी असे वाटू लागले आणि त्याने ते केलेही.

पण लग्नाअगोदर त्याला काही निर्णय घ्यायचे होते, आणखी काही कामे करायची होती. आता तो एकोणतीस वर्षांचा होता आणि लोकांची सेवा कशी करावी हे आता त्याला समजले होते.





“मला आफ्रिकेतील कांगो देशात जायचे आहे. तेथील लोकांबद्दल मी खूप वाचले आहे. तेथे अनेक रोगांनी ते त्रस्त आहेत. मी डॉक्टर बनून त्यांच्या उपचारांसाठी तिथे जाणार आहे.” अल्बर्टने हेलनला सांगितले.

“डॉक्टर? पण त्यासाठी तुला पुन्हा सहा-सात वर्ष शिक्षणात घालवावी लागतील.” हेलन जवळपास ओरडली.

अल्बर्टचा निर्णय समजून घेणे हेलनला कठीण होते. पण तिच्या लक्षात आले की अल्बर्ट त्याच्या निर्णयावर ठाम आहे. त्यानंतर त्याने आईवडील आणि जवळच्या मित्रांनाही सांगितले. त्याने स्ट्रासबोर्ग युनिर्व्हर्सिटीमध्ये मेडिकल विद्यार्थी म्हणून दाखला घेतल्याचे सांगितले.

“तू वेडा झाला आहेस.” त्याचे मित्र म्हणाले.

“मला नाही वाटत.” अल्बर्ट म्हणाला. त्यानंतर त्याने प्राचार्यपदी असलेल्या आपल्या कॉलेजच्या खोलीतून स्वतःचे सामान बाहेर काढले आणि वरच्या मजल्यावरील छोट्या खोलीत ते हलवून तिथून कामाला सुरुवात केली.

लवकरच त्याला अंधाऱ्या प्रयोगशाळा, बऱ्याचवेळ चालणाऱ्या लेक्चर्सचा अनुभव आला. मनुष्याची शरीर रचना आणि रसायनशास्त्र यांचा त्याने बराच वेळ अभ्यास केला की थकून तो जवळच असलेल्या एखाद्या चर्चमध्ये जाऊन ऑर्गनपियानो वाजवून पुन्हा उत्साही होत असे.



आता पुन्हा त्याने त्याचे संगीत कार्यक्रम सुरु केले. पुस्तके लिहायला सुरुवात केली. इतर विद्यार्थ्यांसारखा तोदेखील अहोरात्र मेहनत घेत होता.

“कधी कधी मला तुला भेटून खूप वाईट वाटते. तुला पाहून मी स्वतःला खूप आळशी कोल्हा समजायला लागलो आहे.” रेनार्ड बरेचदा त्याला सांगत असे.

“तू खरंच एक आळशी कोल्हा आहेस. मी एक धडधाकट शेतकरी. एक ताकदवान घोडा. थोडेसे अधिक काम केल्याने माझे काही नुकसान होत नाही.” अल्बर्ट उलटून उत्तर देई.





खरंच अधिक कामाने अल्बर्ट कधी थकला नाही. उलट त्याने तो आणखी शक्तिशाली बनला.

“काय आश्चर्याची गोष्ट आहे. तो जेवढे जास्त काम करतो, तेवढी त्याला अधिकाधिक काम करण्याची शक्ती मिळते.” एका प्रोफ़ेसनेही सांगितले.

“कारण तो काम करताना संपूर्ण समर्पित होऊन करतो.” दुसरा माणूस म्हणाला. “त्याची पूर्ण शक्ती, त्याचा जीव ओतून तो काम करतो, संगीताची आराधना करतो. अर्धवट काम करणे त्याला जमत नाही, आणि म्हणूनच त्याला खूप काही मिळते.”

१९११ मध्ये अल्बर्ट मेडिकल परिक्षा पास झाला आणि पुढे एक वर्ष त्याने इंटर्नशिप केली. त्यानंतर तो पॅरिस मिशनरी सोसायटीकडे गेला.

“मला आफ्रिकेला जायचे आहे. आणि त्यामध्ये मला तुमची मदत हवी आहे. मी एक डॉक्टर आहे. मला अशा ठिकाणी पाठवा जिथे रुग्णालय असेल. मला वेतन नको. मी अनेक पुस्तके लिहिली आहेत. त्यांच्या रॉयल्टीमधून माझी गुजराण होते.” अल्बर्टने सांगितले.

“त्यांना प्रस्ताव अमान्य करणे खूप कठीण होणार आहे.” रेनार्ड कोल्हा बोलला.



रेनार्ड बरोबर होता. मिशनरी सोसायटीच्या सदस्यांनी अल्बर्टचा प्रस्ताव मंजूर केला. ही आनंदाची गोष्ट हेलनला सांगण्यासाठी तो लगेच स्ट्रासबोर्गला गेला.

“ते मला लाम्बोरेने नावाच्या जागी पाठवत आहेत.” अल्बर्टने सांगितले. तो सोबत आफ्रिकेचा नकाशा घेऊन गेल होता. त्यावर त्याने हेलेनला ती जागा दाखवली. ती जागा ओगोवे नदीच्या काठावर होती आणि देशाचे नाव होते गैबॉन. गैबॉन, आफ्रिकेच्या पश्चिमेला आहे.

“हे तर विषुववृत्ताजवळ आहे. म्हणजे तिथे भयंकर गरमी असणार.” हेलेन म्हणाली.



“तू गैबोनच्या वातावरणात स्वतःला सांभाळून घेशील? आफ्रिकेमध्ये तू एकटी माझ्यासोबत राहू शकशील? तिथे कोणी युरोपियन नसतील.”अल्बर्टने तिला विचारले.

“का नाही? मी आरामात तुझ्यासोबत राहीन.” हेलेनने उत्त्र दिले. “तुला भेटल्यानंतर माझी हीच इच्छा आहे.”

त्यानंतर अल्बर्ट आणि हेलेनने लग्न केले. आणि काही महिन्यातच त्या दोघांनी स्टीमरमध्ये बसून आफ्रिकेला कूच केले.





अल्बर्ट आणि हेलेनकडे भरपूर सामान होते. त्यातील गाठोडी आणि खोक्यांमध्ये औषधे आणि रुग्णालयाचे सामान भरलेले होते. एका मोठ्या बॉक्समध्ये पॅरिस बाख सोसायटीने अल्बर्टला भेट दिलेला एक विशेष पियानो होता. त्या पियानोमध्ये शिसे लावलेले होते, जेणेकरुन आफ्रिकेच्या दमट हवेत त्याचे लाकूड खराब होणार नाही.
ओगोवे नदीच्या तोंडावर एक शहर होते, ज्याचे नाव होते केप लोपेज. जेव्हा अल्बर्ट आणि हेलेन तिथे उतरले तेव्हा त्यांचे सामान एका छोट्या स्टीमरमध्ये उतरवले. तो नदीमध्ये चालणारा छोटा स्टीमर होता जो त्यांच्या अंतिम ठिकाणी म्हणजे ताम्बारेनच्या अगदी जवळ घेऊन जाणार होता.

“शेवटचे काही अंतर आपण नावेने पार करु.” अल्बर्टने सांगितले. नदीमध्ये पोहणाऱ्या गेंड्यांकडे तो बघत होता.

“मला तिथे फारसे रुचणार नाही.” रेनार्डने सांगितले.

अल्बर्ट आणि हेलेनसोबत कोल्हा पण आला होता. पण त्याला इथे विशेष काही आवडले नव्हते. त्याला खूप भीती वाटत होती. नदीच्या किनाऱ्यावर त्याने घनदाट जंगल बघितले होते. त्यात त्याला झाडांच्या मागे लपलेले भयानक प्राणीही दिसले होते.



केप लोपेजपासून २५० मील लांब असताना त्यांनी स्टीमर सोडले आणि ते छोट्या छोट्या नावेतून जाऊ लागले.

“जशा छोट्या नावा येतील तसे आम्ही तुमचे सामान पाठवून देऊ.” स्टीमरच्या कप्तानाने त्यांना वचन दिले. “पण पियानो वजनदार पूर्ण तीन टनाचा आहे, त्यामुळे छोट्या नावेवर तो चढवणे आणि नेणे तेवढे सोपे नाही. पण आम्ही पूर्ण प्रयत्न करु.”

“जर आम्हाला जंगलात संगीताशिवाय रहावे लागले तरी हरकत नाही.”अल्बर्ट म्हणाला. नंतर ते दोघे छोट्या नावेत बसून तिथून निघाले.



“मी आता एक सभ्य कोल्हा झालेलो आहे.” रेनार्डने सांगितले. “मला कळत नाहीये हे सारे मला आवडते आहे की नाही.”

अल्बर्ट्ने रेनार्डच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. आजारी आफ्रिकन लोकांना बरे करणारे रुग्णालय पाहण्यासाठी तो खूप आतुर झाला होता. खूप वेळानंतर नाव एका जागी आली. एका उंच माणसाने हता ने इशारा करुन सांगितले, “हेच आहे लाम्बारेने.”

अल्बर्टला तिथे काय दिसले? तुम्हाला काय वाटते?



नदीच्या त्या किनाऱ्यावर एक मोकळे मैदान होते. तिथे काही छोट्यामोठ्या झोपड्या पण होत्या. त्यांच्यामागे मोठे जंगल होते, जणूकाही ते जंगल साऱ्यांना गिळून टाकणार होते.

“इथे माझे रुग्णालय आहे?” अल्बर्ट ओरडला. त्याला ते पाहून धक्का बसला.

“मला माहित होते की इथे काम करणे सोपे नाही. पण एवढे कठीण असेल असे वाटले नव्हते.” हेलेन म्हणाली.





त्या रात्री अल्बर्ट आणि हेलेन एका झोपडीत झोपले. झोपडी बांबूवर उभारली होती, जमिनीपासून उंच. म्हणजे नदीच्या मोठ्या लाटांसोबत वाहून जाण्याची भीती नव्हती.

“खूप छान!” फरशीवर इथे-तिथे पळणाऱ्या साऱ्या किड्यांना बघत, नाक उंचावून रेनार्ड म्हणाला. “आता फक्त ही सारी झुरळे, कोळी ह्यांना लांब ठेवायला हवे.”

अल्बर्टने एक दीर्घ श्वास घेतला. “तू बरोबर बोललास. पण मला ह्या किड्यामुंग्यांची काही फिकीर नाही. असं समजू नको की मी हार पत्करली. मी आता इथेच रहाणार. आणि इथे रुग्णालय नाही, म्हणून इथे नवीन रुग्णालय बनवणार.” अल्बर्टने रेनार्डला ऐकवले.

दुसऱ्या दिवसापासून अल्बर्ट आणि हेलेनने त्यांच्या कामाला सुरुवात केली. त्या मोकळ्या मैदानात एक जुने मोठे खुराडे होते. त्याजागी दवाखाना सुरु करण्याचे त्यांनी ठरवले. त्यांनी जमीन साफ करुन घेतली आणि भिंतींना चुन्याने रंग चढवला. औषधे ठेवण्यासाठी अल्बर्टने लाकडी फळ्यांचे कपाट बनवले.

“हे सारे ठीक आहे. पण इथे स्ट्रासबोर्गच्या प्रयोगशाळेसारखे काही नाही का?” रेनार्ड विचारत होता.

अल्बर्टने नकारार्थी मान हलवून सांगितले, “मी ज्या रुग्णालयात इंटर्न केले त्यासारखे इथे काहीच नाही. पण जोपर्यंत इथे काही सुविधा होत नाहीत तोपर्यंत ह्यामध्येच आपल्याला काम चालवायचे आहे.”



“मला तुझे उत्तर पहिल्यापासून माहित होते. कामाला वाहून घेतलेली कोणतीही व्यक्ती हेच सांगेल. आणि तू हातात घेतलेले काम एकदम वेळेत संपवले आहेस.” रेनार्ड म्हणाला.

“कसली वेळ? तू कशाबद्दल बोलतो आहेस?” अल्बर्टने विचारले.

“जरा बाहेर येऊन बघ.” रेनार्डने सांगितले.



कोल्हा त्या खुराड्याबाहेर आला. अल्बर्टही त्याच्या पाठोपाठ बाहेर आला आणि नदीच्या किनारी बघितले.

तिथे नावा होत्या. डझनभर नावा. आणि प्रत्येक नावेमध्ये कितीतरी लोक होते.

“बातमी तर पसरलेली आहे की लाम्बारेनेमध्ये एक डॉक्टर आलेला आहे. हे रुग्ण इलाज करण्यासाठी आलेले आहेत.” रेनार्डने सांगितले.



“पण हे तर खूप लोक आहेत.” अल्बर्ट ती गर्दी पाहून बोलला. तेव्हाच काही आजारी लोकांना अल्बर्ट समोर आणले.

“तुला इथे एकट्याला प्रॅक्टिस करावी लागेल असे वाटले नव्हते. हो ना?” कोल्ह्याने विचारले.



अल्बर्टने एका कॅम्पबेडचा “ऑपरेशन टेबल” म्हणून उपयोग केला. जसे अल्बर्टने काम सुरु केले, हेलेनने त्याला मदत करायला सुरुवात केली.

बहुतांश लोकांना जंगलात काम करताना, झाडे कापताना, ओंडके वाहून नेताना इजा झाल्या होत्या. काहींना मलेरिया झालेला. काहींना अतिसार. काहींना त्सीत्सी माश्यांचा डंख झाल्याने त्रास झालेला. जर अल्बर्टने त्यांना मदत केली नसती तर बेशुद्ध होऊन त्यांना कयामचे झोपावे लागले असते.





“इथे किती काय करण्यासारखे आहे.” दवाखान्यातला पहिला दिवस संपता संपता अल्बर्ट म्हणाला.

“तुला आठवते का की कॉलेजमधले प्रोफेसर तुझ्याबद्दल काय बोलायचे.” त्याला आठवण करत रेनार्ड सांगत होता, “तू जेवढे अधिक काम करशील, तेवढेच तू अधिक करु शकतोस, कारण ते तू अगदी मनापासून करत असतोस.”

तेव्हा तिकडचा एक उंच रहिवासी तेथे आला. “डॉक्टर तुम्हाला काही मदतीची गरज आहे का?” त्या माणसाने विचारले. तो फ्रेंचमध्ये बोलत होता.



“माझे नाव जोसफ आहे. जोसफ अजावामी. तुम्हाला चालणार असेल तर मी तुमचा असिस्टंट बनू शकतो. मी शक्तिशाली आहे आणि मी बऱ्याच गोष्टी जाणातो.” त्याने सांगितले.

अल्बर्ट हसला, “तू काय काय जाणतोस, जोसफ?” अल्बर्टने विचारले.

“मला इंग्रजी आणि फ्रेंच येते. त्याचबरोबर मला आठ आफ्रिकी भाषा येतात. आणि जर तुम्ही मला काही सांगितले तर मी ते विसरणार नाही.” जोसफने सांगितले.

“खूप छान. तुला असिस्टंट म्हणून कायकाय करता येईल ते आपण पाहू.” अल्बर्ट बोलला.

हे ऐकून तो उंच माणूस हसला. “मी उद्या सकाळी येतो. मी तुम्हाला जे काही दाखवेन त्याने तुम्ही नक्कीच खुष व्हाल.”

तो निघाला आणि जंगलात गायब झाला. रेनार्ड आता अल्बर्ट जवळ येऊन बसला. “मला वाटते की ही एका चांगल्या मैत्रीची सुरुवात आहे.” रेनार्ड बोलला.



रेनार्ड बरोबर होता. त्याचे बोलणे बरेचदा बरोबर असायचे. जोसफ खूप कुशल होता आणि त्याच्या कौशल्याची अल्बर्ट आणि हेलनला फायदेशीर ठरणार होती.

जोसफ पूर्वी स्वयंपाकी होता. त्यामुळे त्याला शरीररचना माहित होती. बरेचदा तो सांगत असे की ह्या माणसाला मटणवाल्या पायात वेदना आहे.मग अल्बर्ट मटणवाला पाय डोळ्यासमोर आणे, वेदना कुठे असेल हे त्याला समजे आणि त्यानुसार इलाज करे.





जोसफ निरक्षर होता. पण बाटल्यांमध्ये ठेवलेल्या औषधाच्या गोळ्या तो ओळखू शकत होता. लवकरच दवाखान्यात आलेल्या कोणत्या रोग्याला कोणते औषध द्यायचे हे त्याला समजू लागले.

त्यानंतर तो अल्बर्टला ऑपरेशनमध्येही मदत करु लागला. ऑपरेशनला आलेल्या रुग्णाला भूल देण्यासाठी हेलेन तयार असे. जोसफ जवळच उभा राही. तो नेहमी अतिशय स्वच्छ आणि चौकस असे. त्याला त्याचा अभिमानही होता. हातात रबरी मोजे घालून अल्बर्टला हत्यारे द्यायला तो नेहमी सज्ज असे.



काही दिवसांनंतर अल्बर्टचे सारे वैद्यकीय सामान आले. मोठमोठ्या झाडांच्या खोडांपासून बनवलेल्या मोठ्या मोठ्या होड्यांतून ते आणले गेले. तीन टनाच्या वजनाचा पियानोही आता अल्बर्टच्या घरी आला. जेव्हा अल्बर्ट थकत असे तेव्हा नेहमीच तो पियानो वाजवी.

“वैद्यकीय अभ्यासानंतर जेव्हा तू थकत होतास तेव्हाही तू हे करत असे.” रेनार्डने सांगितले.

“मी इथे जास्त चिंतीत आहे. मला खूप दुःख होते. माझ्या मनावर इथे जास्त ताण आहे. रेनार्ड, इथे लोकांना भरपूर आजार आणि दुःख आहे. मरणापेक्षाही जास्त वेदनादायी त्यांचा आजार आहे.” अल्बर्ट बोलत होता.

“तरी तू इथे का रहातो आहेस?” रेनार्ड त्याला सांगत होता. “तू पुन्हा तुझ्या घरी जाऊ शकतोस. तुला कोणी अडवू शकणार नाही.”

“मी माझ्या देशात परत जाऊ शकत नाही.” अल्बर्ट म्हणाला. “मला इथे ह्या लोकांची मदत करायची आहे. हे माझे भाऊबहीण आहेत. चांगल्या आणि कठीण कामासाठी समर्पित न केलेले आयुष्य काय कामाचे? फक्त आरामाच्या आयुष्याचा काय फायदा?”

“बरोबर. तू असे करणार नाहीस. मला पक्की खात्री होती.” रेनार्ड म्हणाला.



त्यानंतर अल्बर्टने हरखून जाऊन पियानो वाजवला. त्याच्या पियानोच्या सुरांनी त्याची खोली भरुन गेली. तो उठला आणि राहिलेल्या कामांना लागला. मेडिकलला असतानाही तो असेच करत असे. जो जेवढे अधिक काम करे. त्यापेक्षा जास्त काम करण्याची शक्ती त्याला आपोआप मिळे.

काही महिन्यातच त्यांनी त्या खुल्या मैदानावर रुग्णालयासाठी अनेक इमारती उभारल्या. त्यापैकी एक त्यांनी लोखंडाच्या सळ्यांनी बनविली. जुन्या खुराड्याच्या जागी चालणाऱ्या दवाखान्याची जागा ह्या रुग्णालयाने घेतली. रुग्णालयाचे किमती सामान ठेवण्यासाठी एक स्टोअर रुमसुद्धा बनवली. रुग्णांना रहाण्यासाठी छोट्या छोट्या झोपड्या तयार केल्या. त्या होण्यापूर्वी अल्बर्टचे रुग्ण झाडाखालीच रहात होते.



“मला वाटते की आपले रुग्णालय खूप सुंदर आहे.” जोसफ अभिमानाने म्हणाला.
“मला वाटते की पूर्ण आफ्रिकेमध्ये एवढी चांगली रुग्णालये फारच कमी असतील. मला वाटते की ह्या लाम्बारेनेच्या डॉक्टरच्या पहिल्या असिस्टंटला एक बायको हवी.”
“जोसफ हा तर खूप चांगला विचार आहे. तू लग्न का नाही करत?” अल्बर्टने विचारले.

“कारण लग्न करायला, बायको आणायला पुरेसे भांडवल माझ्याजवळ जमा नाही.” जोसफने सांगितले.





हे ऐकून अल्बर्टला अजिबात आश्चर्य वाटले नाही. कारण तेव्हा गैबनमध्ये प्रत्येक माणसाला लग्न करण्यासाठी पत्नी पैसे देऊन विकत घ्यावी लागत असे. पण अल्बर्ट आता जोसफच्या बुटांकडे बघू लागला.

“जोसफ, तू एकदम नवे चकाकते बूट घातले आहेस. जर डॉक्टरचा पहिल्या असिस्टंटला बायको हवी असेल तर तू एवढे महागडे बूट का घेतलेस?” अल्बर्टने विचारले.

“कारण, लाम्बारेनेच्या डॉक्टरच्या असिस्टंटने बूट घालणे आवश्यक आहे.” जोसफने उत्तर दिले.
नंतर जोसफ नवीन काही रुग्णालयाचे सामान आले आहे का ते पहाण्यासाठी नदीवर आलेल्या स्टीमरवर गेला.

रेनार्ड पण मजेत म्हणाला, “खरच आहे. डॉक्टरच्या असिस्टंट्कडे नवे, चकाकते बूट हवे. खरतर डॉक्टरच्या असिस्टंटकडे अजूनही बऱ्याच गोष्टी हव्या पण ज्यामुळे तो बायकोसाठी कधीच पैसे साठवू शकणार नाही.”

अल्बर्टने नुसती मान हलवली आणि जोसफबद्दल विचार करायचा, तो नदीवरुन परत येईपर्यंतच अल्बर्ट थांबवू शकला. जोसेफ धावत येत होता आणि त्याच्या नव्या, चकाकत्या बुटांबाबत अगदी निष्काळजी होता.

“डॉक्टर, डॉक्टर! अनर्थ झाला!” ओरडतच जोसेफ आला. “स्टीमरचा कप्तान बातमी घेऊन आला आह की युरोपमध्ये युद्ध सुरु झाले आहे.”





ही बातमी ऐकून अल्बर्टला खूप दुःख झाले. त्याला पहिल्यापासून ह्या गोष्टीची भीती होती. १९१४ मध्ये जर्मन आणि फ्रेंचमध्ये बरीच नाराजी होती. आणि आता ह्या दोन देशांमध्ये युद्ध सुरु झाले. आता अल्बर्ट आणि हेलेनचे काय होणार? ते दोघे जर्मनचे होते आणि फ्रांसमध्ये रहात होते.

हेलेनसुद्धा घरातून बाहेर आली. ती पण चिंतातूर झाली. “आता काय?” तिने विचारले.

.“काय माहित? कदाचित ते आपले रुग्णालय बंद करतील आणि आपल्याला परत पाठवतील. पण ही गोष्ट मी माझ्या रुग्णांना कशी समजावू? युद्धात एकमेकांना मारणाऱ्या माणसाच्या वेडेपणाबाबत त्यांना कसे समजावू?”



खूप मेहनतीने आणी खांद्यावरच्या ओझ्याने अल्बर्ट थकला होता. आफ्रिकामध्ये लोकांची सेवा करताना, अडथळे पार करताना त्याला त्याच्या पवित्र आयुष्याचा अंदाज आला होता. आणि प्रत्येक माणूस त्या पवित्र आयुष्यांचा भाग आहे असे वाटत होते. फक्त माणासेच नव्हे, तर आजुबाजूला असलेले सर्व सजीव, प्राणी, किडे, झाडे सारे सारे पवित्र वाटत होते.



काहीच दिवसांनी लाम्बारेनेचे रुग्णालय बंद झाले. रुग्णांना त्यांच्या घरी पाठवण्यात आले. औषधांची निगराणी राखायला फक्त जोसफ राहिला.

अल्बर्ट आणि हेलेनला फ्रान्सला परत पाठवले. त्यानंतर सात वर्षांनी अल्बर्ट लाम्बारेनेचे रुग्णालय पाहू शकला.

काही दिवसांसाठी अल्बर्ट आणि हेलेन बैर्डिओक्समध्ये राहिले. तेथे त्यांना नजरबंदीमध्ये ठेवले गेले. त्यानंतर त्यांना पिरानीज डोंगरांमधील बौद्धविहारामध्ये ठेवण्यात आले. तेथे युद्धामध्ये विस्थापित झालेले, आणि स्वतःच्या घरी परतून शकलेले अनेक लोक होते.

“अल्बर्ट, तेथे अनेक विद्वान लोक असतील. रेनार्डने सांगितले. कोल्हा पण अल्बर्टसोबत बौद्धविहारात गेला होता. तो अल्बर्टसोबत सगळीकडे जाई आणि त्याच्या चमकदार डोळ्यांमुळे काही लपत नसे. “हे विद्वान पूर्ण जग फिरुन आलेले आहेत. आणि एक समर्पित आयुष्य जगणारा माणूस त्यांच्याकडून खूप काही शिकू शकतो.” रेनार्डाची बडबड सुरु होती.

हे ऐकून अल्बर्टने काय केले असावे? तुम्हाला काय वाटते?



अल्बर्टने त्या विद्वानासोबत खूप चर्चा केली. धर्मशास्त्र आणि तत्त्वज्ञानावर त्यांच्याशी वाद घातला.

“असे वाटते की तू पुन्हा विद्यार्थी झाला आहेस.” रेनार्ड म्हणाला. “बिलकुल. माणसाने सारे आयुष्य विद्यार्थी बनून राहिले पाहिजे.” अल्बर्टने त्याला सांगितले.

अल्बर्टने आता पुन्हा लिहायला सुरुवात केली. संगीताचा अभ्यास सुरु केला. जेव्हा त्यांच्याकडे ऑर्गनपियानो नसे तेव्हा तो कोणत्याही खोक्यावर किंवा टेबलावर आपली बोटे फिरवत असे. संगीताच्या तानांमध्ये आपल्या बुद्धीचा आवाज तो नेहमी ऐकत असे.





१९१८ मध्ये अल्बर्ट आणी हेलेन जर्मनीमध्ये आपल्या घरी परतले. तेव्हा पहिले महायुद्ध संपले होते. तेव्हा त्या दोघांना एक मुलगी झाली. अल्बर्ट तेव्हा ४४ वर्षांचा होता.

“आता तुम्ही युरोपमध्येच रहाणार का?” रेनार्डने विचारले. “ह्या छोट्या मुलीला तुम्ही लाम्बारेनेला घेऊन जाणार नाही. तुम्हाला माहित आहे की ती जागा युरोपियन लोकांच्या तब्येतीसाठी ठीक नाही.”

“मी मुलीला तिथे घेऊन जाणार नाही.” अल्बर्टने निश्चय केला. “पण जसे तिथे औषधे, उपकरणे आणि नव्या इमारती उभ्या रहातील तसा मी पुन्हा लाम्बारेनेला जाणार. मला तिथे जावेच लागेल. तिकडचे लोकही माझेचआहेत. नाही का?”



अल्बर्ट आफ्रिकेला परत गेला आणि हेलेन मुलीसोबत स्ट्रासबोर्गमध्ये राहिली.

जेव्हा अल्बर्ट लाम्बारेनेला पोहोचला, तेव्हा त्याने पाहिले की सळ्यांनी उभारलेली इमारत तेवढी शिल्लक होती. तिचे छतही गेलेले.

“जंगलाने सारे काही गिळुन टाकले. झोपड्या आणि स्टोअर सारे गेले. इथे असेच होते.” जोसेफने सांगितले.

“मग आता पुन्हा नव्याने उभारायला हवे,” असे सांगून अल्बर्ट कामाला लागला.

लवकरच अल्बर्टने नवे रुग्णलाय उभारले. त्याच्या मदतीला अजून एक डॉक्टर आला. तो अगदी वेळेत तेथे आला होता. कार्ण तेहा अतिसाराच्या संसर्गाने अनेकांना प्राण गमवावे लागले होते. अल्बर्ट खूप दुःखी झाला होता.

“ते लोक माझे ऐकत का नाही? नदीच्या पाण्यामुळे त्यांना संसर्ग होतो आहे. त्यांना मी नदीचे पाणी कटाक्षाने टाळायला सांगितले आहे. मी इथे आलो मी खरच मूर्ख आहे.” अल्बर्ट अगदी रडकुंडीला आला.

“ठीक आहे डॉक्ट्रर. पृथ्वीवर तुम्हाला जरुर मूर्ख म्हणत असतील. पण स्वर्गात तुम्हाला मूर्ख म्हणणार नाही” जोसेफ धीर देण्यासाठी बोलला.



जोसेफच्या शब्दांनी अल्बर्टला धीर मिळाला. काही दिवसांनी अतिसाराचा संसर्ग कमी झाला. पण रुग्णालयात कायम गर्दी असे. जागा अपुरी पडत होती.

“आपल्याला एका मोठ्या रुग्णालयाची आवश्यकता आहे.” अल्बर्टने रेनार्डला सांगितले. “आणि नव्या रुग्णालयाची जागा कुठे आहे ते मला माहित आहे.”

अल्बर्ट मोटरबोटने नदीच्या वरच्या बाजूस दोन मैल गेला. तिथे २०० एकरांचे मोकळे मैदान होते. “किती सुंदर जागा आहे ही!” रेनार्डला ओरडून अल्बर्ट म्हणाला.



“इथे पुन्हा जंगल आ वासून उभे राहील आणि नदीही पावसाळ्यात उधळून येईल” रेनार्डने इशारा दिला.

“आपण प्रत्येक घर बांबुवर चढवू, जिथे नदी पोहोचू शकत नाही. उरलेल्या जागेत आपण फळझाडे, फळभाज्या आणि धान्य उगवू.”

दीर्घ श्वास घेऊन रेनार्ड म्हणाला, “समर्पण एक चांगली गोष्ट आहे. पण त्यासाठी खूप कष्ट घ्यावे लागतात.”

“मेल्यानंतर आपण खूफ आराम करु, रेनार्ड. आता तर आपल्याला भरपूर काम करायचे आहे.” हसत हसत अल्बर्टने उत्तर दिले.



त्या वर्षी बरे झालेल्या रुग्णांनी नवे रुग्णालय उभारण्यासाठी मदत केली. त्यांच्या कुटुंबांनी आणि मित्रांनीही हातभार लावला. त्यांच्या परिश्रमांच्या बदल्यात अल्बर्टने त्यांना जेवण दिले. काही वस्तूही दिल्या – चमचे, जेवण बनवण्यासाठी भांडी, चादरी, मच्छरदाण्या.

रुग्णालय उभे राहिल्यावर लोकांनी नदीकाठी मोठा सोहळा केला. दूरदुरुन लोक बोटीतून, नावेतून येत होते. जुन्या आणि नव्या रुग्णालयातून फेऱ्या मारल्या आणि सारी उपकरणे, सामानाची हलवाहलव केली. छोट्या छोट्या होड्यातून सामान चढवले. नव्या रुग्णालयांच्या उद्घाटनानंतर लोक खूप खुष झाले. त्यांनी नाचगाणी म्हटली.





केवढा मोठा सोहळा झाला? अल्बर्ट म्हणाला.

तो खूप खुष होता.

“हो, खूप छान झाला.” रेनार्ड म्हणाला. रुग्णांसाठी असलेल्या चाळीस झोपड्या आणि बांबूवर उभ्या राहिलेल्या इतर इमारती त्याने पाहिल्या. लाम्बारेनेच्या नव्या रुग्णालयात एकावेळी सहाशे-सातशे लोक राहू शकत होते.

“इथे गावेही एवढी मोठी नाहीत.” कोल्ह्याने सांगितले.

मध्ये बराच वेळ गेला आणि पुन्हा युरोपसोबत युद्ध पुकारले गेले. पण ह्यावेळी अल्बर्ट लाम्बारेनेमध्येच राहिला. आता हेलेनही त्याच्यासोबत होती. अल्बर्टने तिथे खूप मेहनत केली. पण वेळात वेळ काढून जीवनाचे पावित्र्य आणि समर्पणबद्दल लिहिले.

“आता तू थकला असशील?” रेनार्डने विचारले. “तू आराम का करत नाही?”

“माझी मानवता पैशासारखी आहे. तिला जर मी बंद करुन ठेवेने तर मला काहीच मिळणार नाही. पण मी जर ती खर्च करेन, तर काय जादू होईल सांगता येत नाही.”अल्बर्टने सांगितले.





हळुहळू अल्बर्टने लाम्बारेनेमध्ये केलेल्या कामाची, त्याच्या निष्ठेची साऱ्या जगाला माहिती झाली. अनेक सरकार, युनिव्हर्सिटीजने त्याला पुरस्कार दिले. इंग्लंडची महाराणी एलिझाबेथने त्याला ऑर्डर ऑफ मेरिट दिले. १९५२ मध्ये, स्कॉटहोल्ममधून एक दूत आला आणि अल्बर्टला नोबेल पुरस्कार घेण्याचा आग्रह केला.

अल्बर्टने नोबेल पुरस्काराचा आनंदाने स्वीकार केला. पुरस्कार ३३००० अमेरिकी डॉलर होता. अल्बर्ट त्या पैशातून नवी इमारत उभी करु शकत होता.

सारेजण डॉक्टर होऊन अल्बर्ट श्वाईटजरसारखे आफ्रिकेला जाऊ शकत नाहीत. पण आपापल्या जागी राहून चांगले काम नक्की करु शकतात. अल्बर्टच्या आयुष्याने जगाला हा धडा नक्की दिला. कदाचित तुम्हीपण आता ह्यावर गंभीरपणे विचार कराल.

समर्पणातून उल्लेखनीय कामगिरी होते. रुग्णालये उभी रहातात, रोगांवर इलाज निघतात. पण साध्या सोप्या जगण्यातूनही समर्पण आणि निष्ठा दिसते. समर्पित लोक त्यांच्या रोजच्या जगण्यात अधिक दयाळू आणि मदतीसाठी तत्पर असतात.

इतरांना मदत करणे आणि चांगली कामे करण्याने आयुष्य अधिक सार्थ झाल्यासारखे वाटते. एक अधिक चांगला आणि परिपूर्ण मनुष्य बनवते – अल्बर्ट श्वाईटझरच्या आयुष्यासारखे.








# अल्बर्ट श्वाइटज़र ऐतिहासिक तथ्य

अल्बर्ट श्वाईटझरचा जन्म १४ जानेवारी १८७३ मध्ये एल्सेसमध्ये झाला. तो प्रदेश त्यावेळी जर्मनीमध्ये होता. लहानपणी तो खूप अशक्त होता. त्यामुळे त्याला बाहेर घेऊन जायला त्याच्या आईला लाज वाटत असे. पण आईने त्याच्या तब्येतीची खूप काळजी घेतली. परिणामी दोन वर्षांचा होईपर्यंत तो एकदम सुदृढ झाला.त्यानंतर पूर्ण आयुष्य अल्बर्टने खूप मेहनत आणि परिश्रम केले.

अल्बर्टचे वडील पादरी होते. घरचे वातावरण धार्मिक आणि संगीतमय होते. शाळेत जाण्यापूर्वी वडिलांनी त्याला पियानो शिकवायला सुरुवात केली होती. अल्बर्ट उंच झाल्यावर त्याने चर्चमध्ये ऑर्गन वाजवणाऱ्यांकडून तेही शिकला. त्यामध्ये त्याला एवढे प्राविण्य मिळाले की केवळ वयाच्या नवव्या वर्षी त्याने एकट्याने चर्चमध्ये ऑर्गन वाजवला.

१८९३ मध्ये युनिव्हर्सिटी ऑफ स्ट्रासबोर्गमध्ये प्रवेश घेतला. एकदा सुटीमध्ये तो घरी आला. पुढे काय करायचे? ह्यावर त्याने खूप विचार केला. त्याला जे काम करायला आवडेल तेच तो करणार हे त्याने नक्की केले. लोकांची सेवा करण्यात आयुष्य घालवणार हे त्याने ठरवले. त्याच्या निश्चयापासून तो कधी विचलित झाला नाही. तो खूप नशीबवान होता की त्याची भेट एका प्रसिद्ध इतिहासकाराच्या मुलीशी हेलेन ब्रेस्स्लाऊशी झाली. तिनेही लोकांची सेवा करण्याचा निर्णय घेतला होता. जेव्हा अल्बर्टने डॉक्टर होऊन आफ्रिकेला जायचा निर्णय घेतला तेव्हा तिही आनंदाने त्याच्यासोबत नर्ससारखे जायला तयार झाली.

१९१२ मध्ये अल्बर्टने स्ट्रासबोर्गची डिग्री मिळवली. त्यानंतर तो लाम्बारेने, गैबनला गेला. त्यावेळी गैबन फ्रांसचा एक हिस्सा होता.

अल्बर्टने लाम्बारेनेला रुग्णालय सुरु केल्यावर तो जगप्रसिद्ध झाला. खूप लोकांनी त्याच्या रुग्णालयासाठी पैसे आणि सामान पाठवले. पण सुरुवातीच्या दिवसात अल्बर्टसाठी खूप संघर्षाचे दिवस होते. तो लाम्बारेनेला असताना पहिले महायुद्ध झाले. अल्बर्ट आणि हेलेनला फ्रान्सला परतावे लागले. डोंगरातील बौद्धविहारामध्ये त्यांना नजरकैदेत ठेवण्यात आले. सात वर्षांनंतर तो आफ्रिकेला परत आला तेव्हा रुग्णालय भकास झालेले होते. पुन्हा अल्बर्टने रुग्णालय उभारले आणि मोठे केले. संपूर्ण आयुष्य तो युरोपला जात होता. संगीताचे कार्यक्रम करी. लाम्बारेनेच्या रुग्णालयाबद्दल सांगे आणि पैसे कमवी.

अल्बर्ट श्वाईटझर केवळ डॉक्टर नव्हता, एक धर्मगुरु , तत्त्वज्ञ आणि उत्तम संगीतकार होता. प्रसिद्ध संगीतकार बाख वर त्याने पुस्तक लिहिले. तत्त्वज्ञानातील लेखाने त्याचा युनिव्हर्सिटीमध्ये सन्मान होई. पण लोकांच्या सेवेमुळे त्याला जगभरातून मानसन्मान मिळाला. १९५२ मध्ये नोबेल पुरस्कार मिळाला.

४ सप्टेंबर १९६५ ला लाम्बारेनेमध्ये अल्बर्ट श्वाईटझरचे निधन झाले.